अवर्षणग्रस्त खेड्यातील विद्यार्थ्यांना
परीक्षा फी माफी / फी प्रतिपूर्ती

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- संकीर्ण २०२४/प्र.क्र.०४/ एसडी-५**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२
दिनांक :- ३१ मार्च, २०२४

**संदर्भ :-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एससीवाय-२०२३/प्र.क्र.३७/म-७, दि.३१.०१०.२०२३ व दि.१०.११.२०२३
२) सचिव, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे यांचे दि.१४.०३.२०२४ रोजीचे पत्र
३) शिक्षण संचालक, योजना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे दि.१३.०३.२०२४ व दि.१८.०३.२०२४ रोजीचे पत्र
४) वित्त विभागाचे क्र. अर्थसं २०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि.०८.१२.२०२४ चे परिपत्रक
५) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्रमांक:- निधिवि २०२३/प्र.क्र.५०/एसडी-५, दि.१५.०९.२०२३ व दि.१७.०१.२०२४
६) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्रमांक:- पूर्नर्वि-२८२३/प्र.क्र.१०२/अर्थसंकल्प दि. ३०.०३.२०२३

**प्रस्तावना :-**

महसूल व वन विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दिनांक ३१.१०.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०२३ च्या खरीप हंगामामध्ये महाराष्ट्र राज्यातील ४० तालुक्यांमध्ये तसेच दि.१०.११.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये पूर्वी जाहीर केलेल्या ४० तालुक्यांव्यतिरिक्त इतर १०२१ महसुल मंडळांमध्ये दुष्काळ जाहीर करण्यात आलेला आहे. महसुल व वन विभागामार्फत दुष्काळ जाहीर केलेल्या कार्यक्षेत्रातील महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाच्या इयत्ता १० वी व १२ वीच्या परीक्षेसाठी प्रविष्ट होणा-या विद्यार्थ्यांना परीक्षा फी माफी / फी प्रतिपूर्ती करण्यासाठी निधी मागणीचा प्रस्ताव शिक्षण संचालक (योजना), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये शासनास सादर करण्यात आला आहे.

२. सदर योजनेची अंमलबजावणी करण्याकरीता इयत्ता **१२** वी मधील **२,८४,२०८** विद्यार्थ्यांना रू.**१५,८८,२४,९२५/-** इतकी तसेच इयत्ता **१०** वी **३,२८,९१४** विद्यार्थ्यांना रू.**१६,१९,६२,५५०/-** इतकी रक्कम येते. या सर्व विद्यार्थ्यांना परीक्षा शुल्काची प्रतिपूर्ती करावयाची झाल्यास सन **२०२३-२४** मधील "मागणी क्रमांक २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८०, सर्वधारण, (०४) अवर्षणग्रस्त भागातील विद्यार्थ्यांना परीक्षा फी माफी (०४) (०१) अवर्षणग्रस्त खेड्यातील विद्यार्थ्यांना परीक्षा फी माफी/फी ची प्रतिपूर्ती (२२०२ २५८८ ) या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित करण्यात आलेली व वितरीत करण्यात आलेली रक्कम रू.६० लक्ष वजा जाता एकूण रू.**३२,०७,९७,४७५/-** इतक्या अतिरिक्त निधीची आवश्यकता आहे.

३. सबब, लेखाशिर्ष **२२०२३०५६** व **२२०२** एच **१५१** या लेखाशिर्षाखालील मंजूर अतिरिक्त निधीचे **२२०२२५८८** या लेखाशिर्षाखाली पुनर्विनियोजन करण्याबाबतच्या प्रस्तावास नियोजन व वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेच्या अधिन राहून सदर निधीचे पुनर्विनियोजन करणे व पुर्नविनियोजनाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीच्या प्रमाणात निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महसुल व वन विभागामार्फत दुष्काळ जाहीर केलेल्या कार्यक्षेत्रातील तालुक्यांमध्ये महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाच्या इयत्ता **१०** वी व **१२** वीच्या परीक्षेसाठी प्रविष्ट होणा-या विद्यार्थ्यांना परीक्षा फी माफी / फी प्रतिपूर्ती करण्याची योजना कार्यान्वित आहे. सद्यस्थितीत अवर्षणग्रस्त तालुक्यांतील फी माफीसाठी इयत्ता **१२** वी मधील **२,८४,२०८** विद्यार्थ्यांना रू.**१५,८८,२४,९२५/-** इतकी तसेच इयत्ता **१०** वी **३,२८,९१४** विद्यार्थ्यांना रू.**१६,१९,६२,५५०/-** इतकी रक्कम येते. या सर्व विद्यार्थ्यांना परीक्षा शुल्काची प्रतिपूर्ती करावयाची झाल्यास सन **२०२३-२४** मध्ये वितरीत करण्यात आलेली रक्कम वजा जाता एकूण रू.**३२,०७,९७,४७५/-** इतक्या रक्कमेची आवश्यकता आहे. त्यापैकी एकुण रू. ८.३० कोटी इतका निधीचे पुढील प्रमाणे पुनर्विनियोजन करण्यात येत आहे :-

| अ.क्र | लेखाशिर्ष | सुधारीत अर्थसंकल्पित रक्कम | वितरीत केलेली रक्कम | पुनर्विनियोजित रक्कम | वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १) | २२०२, सर्वसाधारण शिक्षण,८०, सर्वसाधारण ८००, इतर खर्च (०२) संकीर्ण (०२) (४४) विद्यार्थ्यांना इयत्ता १० वी पर्यंत मोफत शिक्षण (कार्यक्रम) (२२०२ ३०५६), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | रू. १४ कोटी | रु.४ कोटी | (-) रू. ६ कोटी | ०० |
| २) | २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८०, सर्वसाधारण ८००, इतर खर्च (०२) संकीर्ण (०२) (५०) शेतकऱ्यांच्या आत्महत्या टाळण्यासाठी विदर्भातील शेतक-यांच्या मुलांना शैक्षणिक सवलती (कार्यक्रम) (२२०२ एच १५१) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | रू. ३.२२ कोटी | रू. ०.९२ कोटी | (-)रू.२.३० कोटी | ०० |
| ३) | २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८०, सर्वसाधारण, (०४) अवर्षणग्रस्त भागातील विद्यार्थ्यांना परीक्षा फी माफी (०४) (०१) अवर्षणग्रस्त खेड्यातील विद्यार्थ्यांना परीक्षा फी माफी/फी ची प्रतीपूती (कार्यक्रम) (२२०२ २५८८) ३४, शिष्यवृत्त्या/विद्यावेतने | रु.०.६० कोटी | रु.०.६० कोटी | (+)रू.८.३० कोटी | रु.८.३० कोटी |

२. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर अर्थसंकल्पित तरतुदीमधून वित्त विभागाने वितरीत केलेल्या निधीच्या प्रमाणात उपरोक्त तक्त्यात नमूद लेखाशिर्षाखाली पुनर्विनियोजनानंतर एकूण रु.८.३० कोटी इतका निधी वितरीत करण्यास व सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देत आहे.

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी (लेखा), शिक्षण संचालनालय योजना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. याबाबतीत वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेली मार्गदर्शक तत्त्वे / शासन निर्णय / शासन परीपत्रक यामधील सूचनांचे पालन करणे आवश्यक राहील.

५. वित्त विभाग, शासन परिपत्रक दिनांक १२.०४.२०२३, दि.०८.१२.२०२३ व दि.०४.०३.२०२४ मध्ये नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता होत आहे.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. १७९/१४७१, दि.२०.०३.२०२४ व वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. ४६७/व्यय-५, दि.२८.०३.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३३११५०४४००३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.03.31 15:24:37 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (शालेय शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३ आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. शिक्षण संचालक (प्राथमिक / माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
५. शिक्षण संचालक (योजना), महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. सचिव, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे
७.सहाय्यक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक, शिक्षण संचालनालय, पुणे.
८. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
९. लेखाधिकारी (लेखा), शिक्षण संचालनालय योजना, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती.